पशुसंवर्धन विभागाच्या विविध केंद्र पुरस्कृत व राज्यस्तरीय योजनेअंतर्गत प्रसिध्दी व प्रचार कार्यक्रम अधिक प्रभावीपणे राबविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- संकिर्ण-२०२२ /प्र.क्र. २४/पदुम-४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक ,**
**मंत्रालय, मुंबई -४०००३२**
**दिनांक :- २४ मार्च, २०२२**

**प्रस्तावना :-**

पशुसंवर्धन विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत योजना जसे कि राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत पशुधन विमा योजना, ॲस्कॅड अंतर्गत माहिती, शिक्षण व लोक सहभाग मेळावे, राष्ट्रीय कृत्रिम रेतन कार्यक्रम तसेच, राज्यस्तरीय पशुसंवर्धन विस्तार आणि प्रसिध्दी / प्रचार या योजनेमध्ये उपलब्ध असलेल्या निधीमधून पशुसंवर्धन विषयक कार्यक्रम, योजना इ. बाबतची माहिती सद्यस्थितीत प्रचलित असलेल्या प्रसिध्दी व प्रचाराच्या पध्दती जसे की भिंती रंगविणे, कापडी बॅनर्स बनविणे, पॅम्पलेट्स, पोस्टर्स, माहितीपत्रिका, घडीपत्रिका, वर्तमानपत्रे, आकाशवाणी, दूरदर्शन इत्यादी माध्यमाद्वारे करण्यात येत असून सदरपैकी आकाशवाणी, दूरदर्शन वगळता इतर माध्यमांचा दृष्य परिणाम दिसून येत नाही.

उपरोक्त विविध केंद्र पुरस्कृत व राज्यस्तरीय योजनांमध्ये असलेल्या निधीचा परिणामकारक विनियोग होवून पशुसंवर्धन विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या विविध योजना कार्यक्रम इ. बाबतची माहिती राज्यात सर्वदूर पोहचण्यासाठी करावयाच्या उपाय योजनांच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णयः-**

पशुसंवर्धन विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या विविध केंद्र पुरस्कृत व राज्यस्तरीय योजनांमध्ये प्रसिध्दी व प्रचार या बाबींसाठी उपलब्ध असलेल्या निधीमधून फ्लेक्स, इलेक्ट्रॉनिक माध्यम, आकाशवाणी, दूरदर्शन, लघु संदेश सेवा (एसएमएस) या माध्यमांमार्फत जास्तीत जास्त प्रसिध्दी व प्रचार करण्यात यावा.

सद्यस्थितीत बहुउदेशीय फ्लेक्सचा वापर मोठया प्रमाणात होत असून, त्याची परिणामकारकता चांगली असल्याची दिसून येत असून असे फ्लेक्स ज्या योजनेमधील निधीमधून करावयाचे आहेत अशा योजनांची माहिती फ्लेक्सच्या मध्यभागी ठळकपणे नमुद करावी व या माहितीच्या सभोवताली पशुसंवर्धन विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या मुख्यमंत्री पशुस्वास्थ योजनेअंतर्गत शेतकरी आणि पशुपालकांसाठी उपलब्ध करुन देण्यात आलेला टोल फ्री क्रमांक १९६२, राष्ट्रीय कृत्रिम रेतन कार्यक्रम, विविध प्रतिबंधात्मक लसीकरण कार्यक्रम, पशुधन विमा योजना इत्यादी कार्यक्रमांची माहिती देखील नमुद करण्यात यावी.

उपरोक्तप्रमाणे बहुउदेशीय फ्लेक्स राज्यातील बसस्थानके, रेल्वेस्थानके, जिल्हाधिकारी कार्यालय, जिल्हा परिषद, पंचायत समिती कार्यालय, तहसिलदार कार्यालय, उपविभागीय अधिकारी कार्यलये, कृषि विभागाचे कार्यालय, पशुसंवर्धन विभागांतर्गत सर्व प्रक्षेत्रे, पशुवैद्यकीय सर्व रुग्णालये / संस्था, ग्रामपंचायती इ. जागी दर्शनिय ठिकाणावर लावण्यात यावेत आणि त्यांचे जतन करावे.

या प्रयोजनार्थ येणारा खर्च दरवर्षी पशुसंवर्धन विभागाकडून राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांमध्ये प्रसिध्दी व प्रचार या कार्यक्रमासाठी उपलब्ध असलेल्या निधीस अधिन राहून विहित शासकीय पध्दतीचा अवलंब करून करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेताक २०२२०३२४१५०२१५४००१ आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने,**

DR. SANJAY
VISHWANATHRAO
DOIJODE

Digitally signed by DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=690002a7555559bb015f315b03adb3305c59fe381e4dcda1439d119129672733, pseudonym=B6831977DAFE9C462B1F5207DB8DC23334F34E62, serialNumber=5DBCE7AE3AC30F0E55C90CD14E851251037DC61F3291C80EA8638C44D41143AA, cn=DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
Date: 2022.03.24 15:03:18 +05'30'

**( डॉ. संजय वि. डोईजोडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे.
४. सर्व जिल्हाधिकारी,
५. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, नागपूर.
७. व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे
८. संचालक (संशोधन ), महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर.
९. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, नागपूर
१०. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त,
११. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद,
१२. अवर सचिव (पदुम -३), कक्ष अधिकारी (पदुम १, २ व १६) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती (पदुम-४).